**भूवैज्ञानिक/भूभैातिकतज्ञ यांच्या मार्फत**
**सर्वेक्षणाचे शुल्क सुधारित करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण ०११९/प्र.क्र.६५/पापु-१५

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, क्रॉफर्ड मार्केट जवळ, नवीन मंत्रालय,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१
तारीख: २४ जानेवारी, २०२२.

वाचा-

**शासन निर्णय क्रमांकः आपना-१०९७/प्र.क्र.१४७/पापु-१५ दि.३० जून, १९९९**

प्रस्तावना

दिनांक ३० जून, १९९९ रोजीच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये भूजल सर्वेक्षणाकरिता व भूभौतिक सर्वेक्षणाकरिता अनुक्रमे रु.१००० व १५०० शुल्क निश्चित केले होते. सदरील सर्वेक्षणाच्या शुल्कात दिर्घकाळ कोणतीही वाढ करण्यात आली नसल्याने सर्वेक्षण शुल्कात वाढ करण्याची व आवक चाचणीसाठी देखील शुल्क निश्चित करण्याचे विचाराधीन होते. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या भूवैज्ञानिक/भूभैातिकतज्ञ यांच्या मार्फत अथवा खाजगी सेवा पुरवठादारामार्फत सर्वेक्षणाकरिता शुल्क विहित करण्याचे विचाराधीन होते. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील मर्यादित मनुष्यबळ विचारात घेता खाजगी अथवा अन्य विभागाच्या शासकीय योजनांकरिता भूजल सर्वेक्षण तातडीने पूर्ण करण्यास मर्यादा येतात ही बाब विचारात घेऊन गरजेनुसार तातडीच्या प्रसंगी भूजल सर्वेक्षण करण्यासाठी सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने खाजगी सेवा पुरवठादार यांच्या सेवा उपलब्धतेसंदर्भात सूचना देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

०२. दिनांक ३० जून, १९९९ शासन निर्णयान्वये विहित शुल्क सुधारीत करण्यात येत असून भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या भूवैज्ञानिक/भूभैातिकतज्ञ यांच्यामार्फत सर्वेक्षणाकरिता सुधारित शुल्क खालील प्रमाणे राहील.

| अ.क्र | बाब | प्रमाण | शुल्क कमाल) (रुपयात)<br>(मर्यादा |
|---|---|---|---|
| १ | खाजगी प्रकरणी सिंचन अथवा औद्योगिक | प्रति प्रकरण | २५००/- |

| अ.क्र | बाब | प्रमाण | शुल्क कमाल ) (रुपयात)<br>(मर्यादा |
|---|---|---|---|
| | विहिरीचे(केवळ Dug well व Tube well करिता) स्थळ निश्चितीकरिता भूजल सर्वेक्षण (यामध्ये पर्जन्य/भूजलाबाबतच्या माहितीचे संकलन तसेच नजिकच्या परिसरातील पिण्याच्या पाण्याच्या, औद्योगिक व शेतीच्या वापरातील किमान पाच विहिरींचे अंर्तभुत आहे) | | |
| २ | पाणी पुरवठा विहिर अथवा हातपंपाचे (Dug well/Bore well/Tube well) स्थळ निश्चितीकरिता भूजल सर्वेक्षण (यामध्ये पर्जन्य/भूजलाबाबतच्या माहितीचे संकलन तसेच नजिकच्या परिसरातील पिण्याच्या पाण्याच्या व शेतीच्या वापरातील किमान पाच विहिरींचे सर्वेक्षण अंर्तभुत आहे. | प्रति गाव/वाडी/वस्ती | २५००/- |
| ३ | भूभौतिक सर्वेक्षण (यामध्ये किमान ३ निरीक्षणांचा (VES) अंतर्भाव आहे) | प्रति प्रकरण | ५०००/- |
| ४ | भूजलधारक क्षमता चाचणी (Aquifer Pump test) विहिर/विंधन विहिर/कूनलनलीका क्षमता (आवक) चाचणी | प्रति प्रकरण | ५०००/- |

०३. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या भूवैज्ञानिक/भूभौतिकतज्ञामार्फत करण्यात येणाऱ्या भूजल सर्वक्षणापोटी प्राप्त शुल्काचा भरणा त्रैमासिक स्वरुपात विहित लेखाशिर्षाखाली शासनास करण्यात यावा.

०४. भूजल सर्वेक्षणासाठी खाजगी सेवा पुरवठादारांची यादी प्रमाणीत करण्याची जबाबदारी आयुक्त,भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांची राहील.

०५. भूजल सर्वेक्षणाकरिता खाजगी सेवा पुरवठादारांची सेवा घेण्याबाबत तद्नुषंगीक जबाबदाऱ्या संबंधीत योजना राबविणाऱ्या यंत्रणेच्या राहतील.

०६. खाजगी/वैयक्तीक स्वरुपाच्या अथवा अन्य प्रशासकीय विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांसाठी खाजगी सेवा पुरवठादारांच्या सेवा घेता येतील. तथापि, याबाबतचा निर्णय संबंधित प्रशासकीय विभागामार्फत/अंमलबजावणी यंत्रणामार्फत घेण्यात यावा. खाजगी सेवा पुरवठादारांच्या सेवांकरिता केवळ सेवा उपलब्धतेच्या दृष्टीने उक्त शुल्क संरचना दार्शनिक स्वरुपात लागु राहील..

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१६४०१६४२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.01.25 18:00:50 +05'30'

(गणेश पवार)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव,राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता,यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता,यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अप्पर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
६. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,पुणे.
७. महालेखाकार, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
८. वित्त विभाग(व्यय-३)
९. नियोजन विभाग ( का-१४१८)
१०.निवडनस्ती (पापु-१५)